**डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद तसेच सदर विद्यापीठाच्या उस्मानाबाद येथील उपकेंद्रासाठी एम.आय.डी.सी कडून जागा उपलब्ध करुन घेण्यासाठी निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २०११/(९५/११)/विशि-२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: १७ ऑक्टोबर, २०११

**वाचा :** (१) शासन निर्णय क्रमांक मविका-२००८/(१२३/०८)/विशि-२, दिनांक १८ जुलै, २००८.
(२) शासन निर्णय क्रमांक मविका-२००८/(१२३/०८)/विशि-२, दिनांक १७ सप्टेंबर, २००८.
(३) शासन निर्णय क्रमांक मविका-२००८/(१२३/०८)/विशि-२, दिनांक २२ ऑक्टोंबर, २००८.
(४) शिक्षण संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.युएनआय/२००९/यो.यो/विशि-१/७६९, दि.१४-५-२००९,

**प्रस्तावना :-** डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद या विद्यापीठाचे उस्मानाबाद येथील उपकेंद्राच्या प्रशासकीय इमारतीसाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडे ६० एकर जागेची करण्यात आली. त्यापैकी सदर महामंडळाने ५ एकर जमीनीचे वाटप केलेल असून उर्वरीत रुपये ५५ एकर जमीनीचा ताबा जमिनीची किंमत १४४.०० लक्ष इतकी महामंडळाकडे जमा केल्यानंतर विद्यापीठास ५५ एकर जमीनीचा ताबा देण्याचे मान्य केले आहे. उस्मानाबाद येथील उपकेंद्रासाठी उर्वरीत ५५ एकर जमीनीचा ताबा मिळविण्यासाठी रुपये १४४.०० लक्ष तरतूद वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :** डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद या विद्यापीठाचे उस्मानाबाद येथील उपकेंद्राच्या प्रशासकीय इमारतीसाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून ५५ एकर जमीनीचा ताबा घेण्यासाठी जमिनीची किंमत १४४.०० लक्ष इतकी महामंडळाकडे जमा करण्यासाठी वार्षिक योजना सन २०११-२०१२ मध्ये रु. २००.०० लक्ष (रुपये दोनशे लक्ष फक्त) एवढा निधि अर्थसंकल्पित झालेला आहे. त्यापैकी रुपये १५०.०० लक्ष तरतूद अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आलेली असून त्यामधून महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून ५५ एकर जमीनीचा ताबा घेण्यासाठी रुपये १४४.०० लक्ष (रुपये एक कोटी चौवेचाळीस लक्ष फक्त) इतकी रक्कम खर्च करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदरहु मंजूर झालेली तरतुद खर्च करण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

२. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल - २ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोजन प्रमाणपत्र (Utilisation Certificate)संबंधितांना योग्य वेळी सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. वरील प्रस्तावांतर्गत होणारा रु.१४४.०० लक्षचा खर्च "मागणी क्र.डब्ल्यू-२, २२०२-सर्वसाधारण शिक्षण ०३-विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२ विद्यापीठांना सहाय्य, (००)(१५) चंद्रपूर, रत्नागिरी, उस्मानाबाद येथील विद्यापीठांच्या उपकेंद्राचा विकास (२२०२ ३५०१) ३१ सहायक अनुदाने" या लेखाशीर्षाखाली तरतुदीतुन खर्च करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २०७/१४७१, दिनांक ११/०८/२०११ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५२६/११/व्यय-५, दिनांक २२/०९/२०११ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय शासनाचे संकेतस्थळ www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यांचा संगणकीय सांकेतांक क्र. २०१११०१७१४३१३८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( वि. मा. पाटील )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४) सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५) कुलगुरु, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद,
६) कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद,
७) सहसंचालक ( उच्च शिक्षण) औरंगाबाद विभाग, औरंगाबाद,
८) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
९)महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे / उस्मानाबाद
११) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
१२)वित्त विभाग,(व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१३) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१४) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१५) मा. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१६) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१७) अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८) निवड नस्ती (विशि-२)

C:\Vivek\SubCentre Chandrapur, Ratn Usmanabad\...